**आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत सन २०२४-२५ मध्ये माणिकराव गावित आदिवासी सहकारी उपसा जलसिंचन योजना, शेनवड बु.व भैरवनाथ आदिवासी सहकारी उपसा जलसिंचन योजना, खैरगाव या योजनेसाठी निधी वितरण (लेखाशिर्ष ४७०२ ७७२१)**

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०२४/ प्र.क्र.२/ कार्यासन-६**
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
तारीख : १२ फेब्रुवारी, २०२५.

**वाचा :-**

१) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.३४/अर्थ-३. दि.२५.७.२०२४.
२) मृद व जलसंधारण विभाग नस्ती क्रमांक आवियो-२०२४/प्र.क्र.६५७/जल-४

**प्रस्तावना :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत मृद व जलसंधारण विभागामार्फत अंमलबजावणी करण्यात येत असलेल्या राज्य एकत्रित निधी अंतर्गत लहान पाटबंधारे योजनेंतर्गत सन २०२४-२५ या आर्थिक वर्षातील तरतूदीमधून लहान पाटबंधारे योजना माणिकराव गावित आदिवासी सहकारी उपसा जलसिंचन योजना, शेनवड बु. व भैरवनाथ आदिवासी सहकारी उपसा जलसिंचन योजना, खैरगाव या योजनांसाठी अनुक्रमे रु. ९५.०० लक्ष व रु. ९५.०० असा एकूण रु. १९०.०० लक्ष इतका निधी वितरीत करण्यास वित्त विभागाने मान्यता दिलेली असल्याने सदर निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत मागणी क्र. टी-६ मधील मुख्य लेखाशिर्ष ४७०२, लहान पाटबंधा-यावरील भांडवली खर्च, ७९६-जनजाती क्षेत्र उपयोजना, (०१)(१८) राज्य एकत्रित निधी अंतर्गत लहान पाटबंधारे योजना (४७०२ ७७२१), ५३-मोठी बांधकामे या योजनेसाठी वित्त विभागाने दिलेल्या मान्यतेस अनुसरुन लघु पाटबंधारे योजना माणिकराव गावित आदिवासी सहकारी उपसा जलसिंचन योजना, शेनवड बु. व भैरवनाथ आदिवासी सहकारी उपसा जलसिंचन योजना, खैरगाव या योजनांसाठी अनुक्रमे रु. ९५.०० लक्ष व रु. ९५.०० असा एकूण रु. १९०.०० लक्ष ( रुपये एक कोटी नव्वद लाख फक्त ) इतका निधी अर्थसंकल्पीय निधी वितरण प्रणालीवर वितरीत व खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे :-

(रु.लाखात)

| **योजनेचे नाव** | **लेखाशिर्ष** | **उद्दिष्ट** | **सन २०२४-२५ करीता अर्थसंकल्पित तरतूद** | **प्रकल्पाचे नाव** | **या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात येत असलेला निधी** |
|---|---|---|---|---|---|
| **१** | **२** | **३** | **४** | **५** | |
| राज्य एकत्रित निधी अंतर्गत लहान पाटबंधारे योजना | ४७०२ ७७२१ | ५३- मोठी बांधकामे | २०००.०० | माणिकराव गावित आदिवासी सहकारी उपसा जलसिंचन योजना, शेनवड बु. | ९५.०० |
| | | | | भैरवनाथ आदिवासी सहकारी उपसा जलसिंचन योजना, खैरगाव | ९५.०० |
| **एकुण** | | | | | **१९०.००** |

उपरोक्तप्रमाणे **रु.१९०.०० लाख (अक्षरी रुपये एक कोटी नव्वद लाख फक्त) इतका निधी प्रशासकीय विभाग प्रमुख म्हणून सचिव, मृद व जलसंधारण विभाग यांना** अर्थसंकल्पीय निधी वितरण प्रणालीवर (BEAMS) निधी वितरीत व खर्च करण्यास मंजुरी प्रदान करण्यात येत आहे.

२. सदर निधी अर्थसंकल्पीय निधी वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात आला आहे. वितरीत निधी खर्च करतांना नियंत्रक अधिकारी यांनी विहित पद्धतीने काटकसरीच्या उपाययोजना करुन खर्च करावा.

३. सदर शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आलेला निधी खर्च करताना नियंत्रक अधिकारी यांनी महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तिय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र.१ च्या शासन परिपत्रकात दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करावे.

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ३६/२०२५ दि.२२.०१.२०२५ अन्वये दिलेल्या मान्यतेस अधिन राहून निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०२१२१६०६४८५६२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

RAJENDRA DEVARAM BHAWARI

Digitally signed by RAJENDRA DEVARAM BHAWARI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT,
2.5.4.20=e2f5429d49742f96b79e4293421ba2dfa8a71cad3864b9b289879d173b67fcdc, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=F617DED8E7182679ED107E63511160B2054D23D8173AD985E5B569A5802CEA5A, cn=RAJENDRA DEVARAM BHAWARI
Date: 2025.02.12 16:07:58 +05'30'

**( राजेंद्र दे. भवारी )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा. राज्यमंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. सचिव, मृद व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई ३२
४. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
५. वित्त विभाग ( अर्थसंकल्प- १९/ व्यय १४ ), मंत्रालय, मुंबई.
६. सर्व लेखा व कोषागार अधिकारी
७. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा मजला, विधानभवन, मुंबई.
८. महालेखापाल (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
९. कार्यासन क्र. ५, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
१०. निवड नस्ती (का.६), आदिवासी विकास विभाग.